# हेलन केलर

# नावाची मुलगी



मराठी : गार्गी लागू



# अध्याय 1

ग्रीष्म ऋतु होता. हवा खूप गरम होती.

१८८० साल होते.

दूर दक्षिणेकडील एका छोटे नगर,

अल्बामामधे एका निरोगी मुलीचा जन्म

झाला. तिचे आई-वडील तिच्यावर खूप

प्रेम करीत होते.

मुलीचे नाव होते हेलन केलर.



ती मुलगी आजारी पडली.
ती दोन वर्षांचीही झाली नव्हती.
दिवसेंदिवस तिचा ताप वाढतच गेला.
नोकरांनी मदत केली. आई-वडीलांनीही
मदतीचा हात पुढे केला. पण डाक्टरांनी
निराशेने मान हलविल. "यापेक्षा जास्त
मी काही करू शकत नाही," ते म्हणाले.
"मुलगी कदाचित वाचणार नाही."



हेलन वाचली......पण आजारानंतर ती पहिल्यासारखी नव्हती. "काहीतरी चुकलेले आहे," तिची आई म्हणाली. शेवटी त्यांच्या लक्षात आले की मुलीला दिसत नाही आहे आणि ऐकूही येत नाही आहे. ती आंधळी आणि बहिरी झाली आहे.





मुलगी मोठी झाली. एक लहान मुलगी झाली. तिच्या आई-वडिलांना वाईट वाटत असे. हेलन कायम रडत रहायची आणि आईला धरून असायची. "या दुर्दैवी मुलीला काय हवे ते दे," असे तिचे वडील म्हणत.

हेलन बहिरी व आंधळी होती पण हुशारही होती. ती प्रत्येकाची नक्कल करीत असे. कधी कधी ती स्वत:च्या वडिलांचीही नक्कल करीत असे. ती त्यांचा चष्मा लावून त्यांच्यासारखाच पेपर हातात घेत असे.





लोकांना वाटत होते की हेलन काहीच शिकू शकणार नाही. पण तिच्या आईला तसे वाटत नव्हते. "हेलन खूप हुशार आहे," ती म्हणत असे. "पण आपण आपलं म्हणण तिला कसे समजाविणार? ती तर स्वत:च्याच कोशामधे बंदिस्त आहे.”

# अध्याय 2

हेलन आता हट्टी, वांड व्हायला लागली होती. ती तिच्या केसांना कुणाला विंचरू देत नसे. तिचे कपडेही घाणेरडे असत.





तिला  खूप राग येत असे. कधी कधी ती जमिनीवर लोळण घेऊन हात पाय आपटत असे.

नंतर तिच्या लहान बहिणीचा जन्म झाला. हेलनला अजिबात आनंद झाला नाही. "बिच्चारी माझी हेलन, आता मला सतत छोट्या मुलीला घेऊन बसावे लागत आहे," तिची आई म्हणाली.



एके दिवशी हेलनने छोट्या बहिणीला पाळणा उलटवून खाली पाडले. "हेलन, नाही....." आई ओरडली. "काय करायला हवे? आपल्याला कुणाचीतरी मदत घ्यायला हवी."



केलर परिवार प्रसिध्द अलेक्झांडर ग्रॅहम बेल यांना भेटण्यासाठी वाॅशिंग्टन डी सी ला आला. ते हेलनला मदत करू शकतील. डाक्टर बेल यांनी टेलिफोनचा शोध लावला होता. ते बहिर्या लोकांना शिकवित असत. "हेलन शिकू शकेल," डा. बेल म्हणाले. "पण तिला प्रशिक्षित शिक्षिकेची आवश्यकता आहे. बोस्टनमधील पर्किन्स शाळेला पत्र लिहून एक शिक्षिका पाठविण्याची विनंती करा."



हेलनच्या वडिलांनी शाळेला पत्र लिहीले.

लगेच त्यांना उत्तरही आले. "देवाची कृपा," ते म्हणाले.

"पर्कन्स शाळा एका शिक्षिकेला पाठवित आहे."



## अध्याय 3

३ मार्च १८८७ या दिवशी दुपारी एक शिक्षिका आली. त्यावेळी हेलन दाराजवळच उभी होती. तीला जिन्यावरून कुणीतरी येत असल्याचे जाणविले. तिला वाटले आईच आली आहे. म्हणून तिने हात पुढे केला.





कुणीतरी हेलन हात पकडला
आणि  आपल्याजवळ ओढून घेतले.
ती हेलनची आई नव्हती. हे लक्षात
आल्यावर हेलन मागे झाली. ती एनी
सालिवन होती....हेलनची शिक्षिका!
हेलनला आजूबाजूच्या जगाशी परिचय
करून देण्यासाठी ती बोस्टनहून आली
होती. हेलनवर प्रेम करण्यासाठी आली
होती. खूप मोठी झाल्यावर हेलन या
दिवसाला तिच्या 'आत्म्याचा
जन्मदिवस' असे सांगत असे.

पहिल्याच दिवशी मिस  सलिवनने
हेलनला एक बाहुली दिली.
"ब..आ..ह.....उ...ल....ई.....बाहुली,
"मिस सलिवन म्हणाली.
तिने त्या शब्दाची अक्षर बोटाने
वेगळ्या वर्णमालेत हेलनच्या
हातावर लिहिली. हातांच्या खुणेने
अक्षर ओळख करून देणारी ती
लिपी होती.





हेलनने आपल्या शिक्षिकेची नक्कल केली.
तीने बाहुली शब्द संकेत लिपीमधून
सांगितला. पण तीला कळत नव्हत की ती
काय सांगत आहे.

लवकरच मिस सलविनच्या लक्षात आले की हेलन तीला जे करायचे आहे तेच करते. जेवतांना ती खुर्चीवर बसत नसे. टेबलाभोवती फिरून प्रत्येकाच्या ताटांतील पदार्थ घेऊन बोटाने चाटत खात असे. "तुम्ही हेलनचे लाड करीत अहात हे बरोबर नाही." मिस सलविनने हेलनच्या घरातील लोकांना सांगितले. "समाजात कसा व्यवहार करायचा हे तीला शिकवायला हवे."





पुष्कळच आरडाओरडा करावा लागत होता. "हेलन, मी तुला सांगते तसच तुला कराव लागेल," मिस सलिवन ओरडली. पण हेलन काही ऐकूच शकत नव्हती. तिने हेलनला खुर्चीत बसवलं.....हेलन उठून उभी राहिली. तिने हेलनला चमचा धरायला लावला....हेलनने तो फेकून दिला, तिने स्वत:चे ताट हेलनला दिले....हेलनने ते दूर भिरकावून दिले.

दरवेळी जेवणाच्यावेळी अशीच लढाई होत असे. पण काही दिवसांनी मिस सलिवनला यश मिळू लागले. शेवटी हेलन खुर्चीवर बसली.



आईला हेलनची काळजी वाटत असे. "मिस एनी, तुम्ही हेलनवर फार सक्ती करीत अहात," मिसेस केलर म्हणाली.

पण मिस सलिवनचा निश्चय कायम होता. "हेलनवर नियंत्रण आणल्याशिवाय मी तिला काहीच शिकवू शकणार नाही."





मिस सलिवनने मिस्टर केलर यांना सांगितले की "काही काळ एकट्या हेलनला माझ्याबरोबर रहावे लागेल" ......आपल्या बागेतल्या छोट्या घरात आम्ही राहू का?"

"फक्त दोन आठवडे.......जास्त नाही," मिस्टर केलर म्हणाले.



हेलनचे आई-वडील मोठ्या प्रवासासाठी घोडागाडीतून तिला घेऊन गेले. आणि बगिच्यातील छोट्या घरात तिला घेऊन आले. त्यामुळे हेलनला समजलेच नाही की ती घराच्या जवळच आहे.

# अध्याय 4

मिस सलिवन कठोर होती पण दयाळू पण होती. हळूहळू हेलनला ती आवडू लागली. त्या छोट्या घरात दिवसरात्र मिस सालिवन शब्दाच्या अक्षरखुणा सांगत होती. म...ओ...त....ई...मोती, प...आ..न...ई...पानी, ...हेलन त्या अक्षर खुणा हातावर लिहून दाखवित होती. पण अजूनही तिला कळत नव्हते की ती काय करते आहे. "हेलन, प्रत्येक शब्दाला अर्थ असतो!" मिस सलिवन म्हणाली. हेलनला शब्दाचा अर्थ समजावून सांगण्याचा प्रयत्न करीत होती.



दोन आठवडे संपले. हेलन व मिस सलिवन मोठ्या घरात परत आल्या. हेलन अजूनही हातांच्या खुणांचा अर्थ समजू शकत नव्हती. पण तिच्या शिक्षिकेने हार मानली नाही. एके दिवशी ती हेलनला पाणी आणि मग हे दोन शब्द शिकवित होती. हेलन परत परत ते शब्द गिरवीत होती. "आपण थोडी विश्रांती घेऊ या. जरा बागेत फिरून येऊ या," मिस सलिवन म्हणाली.



छान उबदार दिवस  होता. उन्ह वर आली होती. हेलन व तीची शिक्षिका बगिच्यामधे आली. दोघी पाण्याच्या पंपाजवळ आल्या. मिस सलिवनच्या मनात विचार आला. तिने पाण्याचा पंप चालू केला. पाणी वाहू लागले. मिस सलिवनने वाहत्या पाण्यात हेलनचे हात धरले. मग तिने हातावर पाणी शब्द लिहिला. आणि म्हणाली, "पाणी, ...हेलन ! प..आ..न..ई!”



हेलनच्या लक्षात आले. तिला समजल की प..आ..न..ई..चा अर्थ ती ओली वस्तु जी तिच्या हातावरून वहात आहे. तीला कळलं की "पानी" हा एक शब्द आहे. तीला कळून चुकलं की शब्द किती महत्वाचे आहेत. तिला जे जाणून घ्यायच होत ते शब्दामार्फतच तिला कळू शकते. "माझं ह्रदय आनंदाने गाऊ लागलं!" नंतर तिने लिहून ठेवले आहे की "जणू काही माझा पुनःजन्म झाला!"





आता हेलनला प्रत्येक वस्तुचे नाव जाणून घ्यायचे होते. फ..ऊ...ल....फूल,

ध...अ....र...अ...त...ई..धरती, मग तिने सलिवनकडे बोट दाखविले. सलिवनने अक्षरखुणा लिहील्या....श...इ....ज्ञ....इ...क...आ..

..शिक्षिका!



मिस सलिवनला कळून चुकलं की हेलनला समजू लागले आहे. तीला खूप आनंद झाला. तिने लिहून ठेवले आहे, "आनंदाने माझ हृदय फाटून जाईल!"

हेलनला घेऊन मिस सलिवन धावतच घरी आली. बागेत जे घडलं ते सर्व तिने सांगितले. हेलनच्या आईच्या डोळ्यात अश्रू आले...."माझी गुणाची बाळी!" ती म्हणाली. मिसेस केलर परत शिक्षिकेकडे वळून म्हणाली, "मिस एनी, तू जे काही केले आहेस तो एक चमत्करच आहे."



ते सत्य होते. त्या दिवशी तो चमत्कारच झाला होता. पण तो काही शेवटचा चमत्कार नव्हता. हेलनच्या जीवनांत असे अनेक चमत्कार झाले.

# हेलन केलर 1880-1968

पुढील काही वर्षात हेलन लिहायला, वाचायला शिकली. बोलायलाही शिकली. ती शाळेत गेली. रेडक्लिफ कॉलेजमधून पदवी संपादन केली. एनी सलिवनने शाळेमधे हेलनची खूप मदत केली. जवळजवळ ५० वर्ष दोघी एकत्र राहिल्या. शिक्षिकेच्या मृत्युपर्यंत दोघी एकत्र होत्या.









आपल्या जीवनात हेलनने एकूण पाच पुस्तके लिहिली. पुष्कळ ठिकाणी प्रवास केला. राजेमहाराजे, राष्ट्रपती यांना भेटली. जगभर फिरून कित्येक लोकांना संभोधित केलं. जास्तीत जास्त कार्य तिने अंध व बहिर्या लोकांना मदत करण्यासाठी केले. ती एक छान मैत्रिण आणि दयाळू महिला होती. लोक तिच्यावर खूप प्रेम करीत होते. हेलन केलरच्या जीवनावरून खूप लोकांना प्रेरणा मिळाली.

## एक हाथ से अंग्रेजी के अक्षर संकेत




**समाप्त**